सोमवार, दिनांक ५ जुलै २०१० रोजी होणारा देशव्यापी संप
लक्षात घेता घ्यावयाची दक्षता व करावयाची कार्यवाही.

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
परिपत्रक क्र : कृबास ०७१०/प्र.क. २८४/११-स
दिनाक : ०३ जुलै, २०१०.

# परिपत्रक

**प्रस्तावना :-** सोमवार, दिनांक ५ जुलै, २०१० रोजी देशातील विविध राजकीय पक्षांनी महागाई विरोधी संपाचे आवाहन केले आहे. या संपामुळे सर्वसामान्यांचे जनजीवन विस्कळीत होऊ नये व जीवनावश्यक वस्तूंचा उदा. भाजीपाला, फळे व अन्नधान्ये यांचा पुरवठा सुरळीत रहावा या दृष्टीने पणन विभागाच्या अधीपत्याखाली कृषी उत्पन्न बाजार समित्यांच्या कामकाजा संदर्भात पुढील काळजी व दक्षता घेण्यात यावी.

१) राज्यातील सर्व कृषी उत्पन्न बाजार समितीचा शेतमाल व भाजीपाला घेऊन येणाऱ्या शेतकऱ्यांना संपाच्या दिवशी सुरक्षिततेची हमी राहील याकरिता सर्व जिल्हा उपनिबंधकांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील कृषी उत्पन्न बाजार समित्यांना किती प्रमाणात पोलीस संरक्षणाची आवश्यकता आहे याची तातडीने माहिती घेऊन त्याबाबत जिल्हा पोलीस अधिक्षकांच्या मदतीने, शेतमाल घेऊन येणाऱ्या शेतकऱ्यांना सुरक्षितपणे शेतमाल बाजार समितीत आणता येईल याकरिता संरक्षण उपलब्ध करुन द्यावे तसेच तालुकानिहाय सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था व त्यांच्या अधिपत्याखालील कर्मचारीवर्ग यांची देखील आवश्यकतेनुसार याकामी नेमणूक करण्यात यावी.

२) त्याचप्रमाणे कृषी उत्पन्न बाजार समित्यांमध्ये होणाऱ्या लिलावात भाग घेण्याकरिता येणारे व्यापारी यांनादेखील सुरक्षित वातावरण उपलब्ध करुन देण्याकरिता भाग-१ मध्ये नमूद केल्यानुसार कार्यवाही करण्यात यावी. तसेच संबंधित शेतमाल, व्यापाऱ्याने खरेदी केल्यानंतर तो व्यापाऱ्याच्या गरजेप्रमाणे सुरक्षित स्थळी नेण्याकरिता त्यास पोलीस सरंक्षण देण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही जिल्हा पोलीस प्रशासनाच्या मदतीने करावी.

३) सोमवार, दिनांक ५ जुलै २०१० चा संप लक्षात घेता रविवारी दिनंक ४ जुलै २०१० रोजी सर्व बाजार समित्या चालू राहतील व त्यामध्ये अधिकाधिक व्यवहार होऊन पुढील दिवशी जीवनावश्यक शेतमाल व भाजीपाला यांचा पुरवठा कायम राहील याकरिता सर्व जिल्हा उपनिबंधकांनी संबंधित बाजार समित्यांना आवश्यक त्या सूचना द्याव्यात.

४) या संदर्भात कोणतीही समस्या व अडचणी निर्माण झाल्यास त्याचे निराकरण करण्याकरिता पणन संचालक, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र कृषी पणन मंडळ, पुणे येथे एक संनियंत्रण कक्ष (Control Room) उभारण्यात यावे. या नियंत्रण कक्षाचा मंत्रालय, मुंबई येथील नियंत्रण कक्षाशी सततचा संपर्क राहील व त्या आधारे राज्यभरातील परिस्थितीचे अवलोकन केले जाईल.

५) मुंबई कृषी उत्पन्न बाजार समितीने त्यांचे कार्यक्षेत्रात, बहुतांशकरुन नाशिक व पुणे येथून येणाऱ्या आवकेसाठी स्थानिक पोलीस प्रशासनाच्या मदतीने शेतकऱ्यांना व व्यापाऱ्यांना सुरक्षिततेचे वातावरण उपलब्ध करुन देण्याकरिता आवश्यक ती कार्यवाही करावी. तसेच सचिव, मुंबई कृषी उत्पन्न बाजार

समिती यांनी संप कालावधीत उद्भवणाऱ्या समस्या व अडचणी यांचे निराकरण करावे व आपल्या कार्यालयातील एका जबाबदार अधिकाऱ्यांची नेमणूक मंत्रालय, मुंबई येथील नियंत्रण कक्षात करावी.

६) संप कालावधीत कोणतीही अडचण, समस्या उद्भवल्यास त्याची माहिती कृषी पणन मंडळाअंतर्गत स्थापन केलेल्या नियंत्रण कक्षाच्या दूरध्वनी क्रमांक (०२०)-२४२०११९० / २४२६८२९७ / २४२६३४८६ येथे कळवावे. तसेच मंत्रालय येथील नियंत्रण कक्ष दूरध्वनी क्रमांक (०२२)-२२७९३५५१ / २२०२७९९०, मुंबई कार्यक्षेत्राबाबत सचिव, मुंबई कृषी उत्पन्न बाजार समिती भ्रमणध्वनी क्रमांक ९९२२९५१५०५ येथे तात्काळ संपर्क साधण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

**( अजिंक्य व बगाडे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन,
सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग.

प्रति,

१) सहकार आयुक्त, पुणे.
२) पणन संचालक, पुणे
३) सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, गुलटेकडी, मार्केट यार्ड, पुणे.
४) सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक, महाराष्ट्र राज्य.
५) सर्व विभागीय सहनिबंधक, महाराष्ट्र राज्य.
६) सर्व जिल्हा उपनिबंधक, महाराष्ट्र राज्य.
७) सचिव, मुंबई कृषी उत्पन्न बाजार समिती.
८) मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव (पणन) यांचे स्वीय सहाय्यक.